ई-साहित्य प्रकाशन

अंक ३६, दिनांक २० जुलै २००९

# काहीतरी वेगळं



संपादक - भारती सरमळकर (मुंबई)

अतिथी संपादक - शशांक नवलकर (मुंबई)

सह संपादक

अहं ब्रह्मास्मि (पुणे), सोनाली घाटपांडे (पुणे), सारंग भणगे (पुणे), स्वप्ना कोल्हे (नाशिक), सचिन काकडे (मुंबई)

लागलात इतक्यात डोकं खाजवायला ना !!

चला तर आज तुमच्या देऊ, काही झटकेदार तुम्ही सगळे? चला तर रसिक वाचकांसाठी आहे काही **"हटके**



डोक्याला थोडी खमंग फोडणी हटके कवितांची, आहात न तयार मग **नेटाक्षरी** आपल्या सर्व घेऊन येत **झटके"**

## फोडणीच्या सामानाची यादी

- वर्तुळातील भूमिती
- परदेशातील अलफॅन्सो
- कठपुतळी
- दुर्गंधीचा सुगंध
- पुरुषांची व्यथा
- मद्याची जुगलबंदी वाद्याशी
- चिंध्या
- आणि बरेच हटके झटके

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

**netaksharee@gmail.com**

## भूमिति

शून्य माझं वर्तुळ

त्याला ना अंत , ना कोणाचा आरंभबिंदू!

मात्र एक इवलासा सर्वव्यापी

केंद्रबिंदू

जो ठरवतो माझी त्रिज्या

माझा परीघ!

**आसावरी गुपचुप**

## याचि देही... याची डोळा...

तुझ्या पुष्ट सौष्ठवावर
नजरेनेच हात फिरवता
फिरवता
मी डोळे मिटून ती गोलाई अनुभवतो

- मी डोळे मिटले की
- अंतरही मालवते
- आणि अंतर्गीत उमलते
- अंतर्गती उफाळून येते
- मनसोक्त दृष्यं लवलवतात
- अभिसरण उसळतं धमनीतून
- धग जाणवते
- घनघोर धबधबे
- भिल्लाच्या राकट खांद्यादंडासारखे
- उसळतात उधळतात
- खालून वर कारंजी उचंबळतात
- सर्वांग थरथरतं
- मेंदू झणाणतो
- छातीचा भाता फुटणार आता
- शिवमणीच्या ड्रमसारखा
- धप्प धप्प धम्म धम्म
- पखावजाचा धधत्कार
- रतगंधाराचे सूर
- चिकट मधुर

मी डोळे उघडतो
समोर सारं तसंच
संथ
शांत
निर्जीव
सपक
आणि तुझं निर्मळ स्मित

**टल्ली**

## पुरुष आणि डुक्कर



माझ्यावरती रागावली की ती प्रेमाने मला डुक्कर म्हणते...
परवा दिवशी ती इतक्या लाडानी मला डुक्कर म्हणाली की
पलिकडच्या चिखलातील एक डुक्कर लाजलं
आणि एक बाई कडे बघून लाजला म्हणुन
त्याच्या बायकोशी त्याच वाजलं
त्याची बायको त्याला म्हणाली
आरे लाज वाटते का तुला...
काल तर म्हणलास की माझ्या सोबत खुश आहेस
पण तु काही सुधारणार नाहीस
डुक्कर कसला पुरुष आहेस...
तिनी त्याला पुरुष म्हणू दे
किंवा हीनी मला डुक्कर
हि तर प्रेमाची हाक आहे...
पण माणुस व्हा नाहीतर डुक्कर
शेवटी बायको म्हणजे धाक आहे...

धुंद रवी

## देव नाही . . न्हावी नाही

न्हावी थोडा चिडून म्हणाला
"देव नसे तो कुठे जगात ,
असता तर का इथली दुःखे,
बसला असता असा पहात ?"
"जगात या न्हावीही नाही "
एक गिऱ्हाइक म्हणे हसोनी,
रस्त्यावरच्या जटा वाढल्या ...
भणंगाकडे बोट दाऊनी ...
न्हावी आश्चर्याने वदला
"काय बोलता हे हो बापू !
माझ्यापाशी आल्याविण तो
केस तयाचे कसे मी कापू ?"
"तसेच तेही आहे मित्रा"
गिऱ्हाइक ते ज्ञानी बोले,
"देवापाशी गेलो तर ना
निवारील तो दुःख आपले !"



अहं ब्रम्हास्मि (आधारीत)

## मद्य आणि वाद्य

'वाईन' असते वायोलिन सारखी
वेदनेच्या तारा हळूवार छेडणारी. . .!
श्वासामध्ये विरघळून काळजाला भिडणारी
उदास उदास कातरवेळी
वर वर बिनधास्त . . .
आत आत हळहळणारी . . . !



'रम' असते तबल्यासारखी
सगळ्या संवेदना क्षणात जागवणारी
एका नादखुळ्या स्पर्शानेच . . .
धरेवरून आभाळात झेपावणारी . . . !
रात्रभर तालाच्या आवर्तनात घुमून
पहाटे पहाटे समेवर येणारी !

'बिअर' असते मंदधुंद बासरी
ओठांनी स्पर्शिली की ओठांपेक्षाही लाजरी . . . !
नसानसातून वाहणारी अलगद आणि लहरी . . .!
'शँपेन' असते मँच जिंकल्यावर निनादणारा उत्स्फुर्त बिगुल
कुणी दखल घेतली तर ठीक, नाहीतर आपल्यातच मश्गुल



'स्कॉच' म्हणजे झटका देणारी गिटार
कलत्या रात्री , भलत्या क्षेत्री , झुलत्या चंद्राबरोबर
प्रत्येक ठेक्याला चढणारा थरार
मद्य नसेल तर वाद्यांचा नुसता कोलाहल
वाद्य नसेल तर मद्य जाचक , जहरी हलाहल
दोन्ही नसेल तर अवघे जगच सुनी सुनी मैफल

**गौरी सावंत**

## दुर्गंधी २

शहराबाहेरच्या
डंपिंग ग्राउंडवर
नाक दाबून चालणेही अशक्य झाले
तेव्हा
तेव्हा . . . . राम्याला आनंद झाला
झोपडी बांधायला जागा गावल्याचा



राम्यामागून सोम्या
सोम्यामागून गोम्या आले
होता होता राम्याच्या लटांबराची
हजार झोपड्यांची पट्टीच लागली
त्यातलाच दाम्या
दाम्याने वीज पाणी
आणि स्वच्छ हवेच आश्वासन दिल
आणि निवडणूक जिंकली
दाम्यान शब्द पाळला
दुर्गंधीच डंपिंग ग्राउंड
 बनल एक सुरेख बाग
होता होता दाम्या बनला
बिल्डर
बुल्डोझर आले सुंदर बागे जवळच्या
गलिच्छ वस्तीचा
कलंक पुसला
शहराला स्वच्छ हवा मिळाली
दाम्याने नवीन बंगल्याच पुजन केल
राम्या
सोम्या
गोम्या
निघाले
नवीन डंपिंग ग्राउंड कडे
जिथे नाक दाबून चालणेही अशक्य झाले होते.

**टल्ली**



## काळघोडे

काळाचे घोडे उधळले
मनी भयखुर रोवूनी
भरकटले धुके अंगणी
विझल्या पणतीस चकवूनी !!

झाडी दाटल्या अरण्यात
चुकला आंधळा वाटसरू
लगाम सोडूनी पळती
पराजित युद्धातले वारू !!

गर्भ पडल्या पोरीचे
कलेवर तरंगते विहीरीत
हरविल्या पिल्लांची माय
ढाळते आसवे घरट्यात !!

घशात दाटल्या हुंदक्यांना
कुणी दाखवावी वाट
उघडे पडले शिंपले
वाहूनी जाणार लाटेत !!

वाट चिरूनी पावसाची
कुठे फिरतात हे जोगी
काते तुडवूनी पायदळी
मुक्कामी चालतात वेगी !!

**विजयकुमार**

## अल्फांसो ... (परदेशातल्या कविता)
## अल्फांसो ...हापूस आंबा ...

इंग्रजांच्या देशात...
चक्क पिवळा धमक ...
कोकणातला हापूस आंबा मिळाला...
विश्वासच बसत नव्हता डोळयांवर...
चार वेळा चेक केला... मुंबईहून इम्पोर्ट केलेला होता
एकदम आनंदी आनंद गडे...

गेले पाच उन्हाळे इथेच गेल्याने..
आंबे कायमच मिस करत होतो...
आंब्याचा वास घेतला...मन भरे पर्यंत..
रस खायला पण धमाल आली...
माझ्या पोरीला आंब्याची कोय खायला शिकवल
किती वर्षांनी इतकी मज्जा.....
आंब्याची चव मस्त जिभेवर रेंगाळत हॊती
किती मिस करत होतो आंबा....आणि अश्या
ब-याच गॊष्टी
किती तरी छोट्या छोट्या गॊष्टींसाठी वाटत..



आत्ता परत जावं भारतात....
अश्या एक एक मिस होणा-या गोष्टीतून.....
आठवणींच्या धाग्यातुन
परतीचे दोर विणत असतो .....

आज इथे आंबा मिळाला..
आणि त्या दोरातला एक धागा तुटला....
मगाशी गोड लागलेला आंबा..
आता तितकासा गॊड वाटत नव्हता....

**आकाश बिरारी**



कठपुतळी......

अनेक धाग्यांनी गुंफलेली
दुसऱ्याच्या हातानी बांधलेली
मुक भावनांनी भरलेली
मी एक कठपुतळी....

नाचते मी त्याच्या तालावर
बोलते मी त्याच्या बोलावर
ना फुलती हास्य ओठावरती
ना अश्रूही पाझरती
मृत असून जगणारी
मी एक कठपुतळी

ना मज होती वेदना
नाहीत मज त्या भावना
त्याच्या हातीच माझी दोर
खेळ त्याचा मी खेळणारी
मी एक कठपुतळी

त्याच्या तालावरच केला मी नाच
त्यानेच केला माझा नाश
फेकून दिले अंधारात
नाच कधी हा थांबे ना
जिते आयुष्य त्याच्यासाठीच
लपंडाव माझ्या अस्तित्वाचा
त्या एका दोरीवरती
अशी मी एक कठपुतळी....

**शशांक नवलकर**

# पाऊस कॉफी आणि कलिंगड

पाऊस पडायला लागला की
मी दुकानात जाऊन कॉफी पितो
कॉफी प्यायला लागलो की
विचाराना आमंत्रण देतो
भारी विचार आले नाहीत की
कलिंगडावरही कविता करतो

जिवनात कोणी खास असलीच
तर कलिंगडासारखी असावी
लोकांना रूक्ष वाटत असली तरी
माझे लक्ष वेधून घेणारी असावी

बाहेरून हिरवीगार आणि शांत
वरून असावी थंड आणि कडक
आत मात्र प्रेमाचे महासागर आणि
सागरात बुडवलेली ज्वाला मात्र भडक



तिव्र उन्हात निस्वार्थीपणे
आनंद देणारी असावी
आणि स्वतःच महत्व समजवण्यासाठी
अडकणा-या बिया असणारी असावी

बाहेर पाऊस पडायला लागला की
कॉफी प्यायला बरोबर बसावी
आणि वास्तवात नसली तरी, कलिंगडासारखी
निदान कवितेत तरी बरोबर असावी

मयुरेश कुळकर्णी

# चिंध्या

एक दिवस असावा आपला
जगावं आयुष्य मनासारखं
राहाव "मी" पण त्यांच्यासारखं
एक दिवस असा असावा
नसाव्या अंगी त्या फाटक्या चिंध्या
"चिंध्या".....
फाटक्या आयुष्याच्या...
फुटक्या नशीबाच्या.....



बघते "मी" त्यांना रोज...
लपवते माझे अस्तित्व
अजाणतेपणी
वावरत असते त्या जगात
लपवूनी माझे स्त्रीत्व........
त्या विक्षिप्त नजरांपासून
आहेत त्या चिंध्याच आज माझे अस्तित्व.......

बनूनी एक 'भिकारीण'
मोडीते तुकडे माझ्याच काळजाचे
नाही मागणार आयुष्याची भिक.......
होईन मी श्रीमंत
जोडूनी तुकडा तुकडा काळीज
आहेत ह्या चिंध्या माझं सर्वस्व
त्याच चिंध्या आहेत माझे अस्तित्व
फाटक्या कपड्यात वावरणारी
ती स्त्री कोण ?
"चिंधी "

नाही अनोळखी
कोणत्याच रस्त्यावर
खेळवली जाते......रंगवली जाते
बरबटवली जाते.....भिरकावली जाते
असते कायम फाटलेलीच
तिचे नशीबही फाटकेच
तिचे आयुष्य ही..........
फाटक्यातूनही निरागस
आयुष्य आनंदात जगणे
हे तिचे साहस........
स्मित हास्य ओठांवरती
कधी ना ओघळती अश्रू गालावरती
ती एकली नाही

चिखलातही कमळ उमलते
वादळानंतरही फुलाला कळी उमलते
हे जग...दरवेळी तिच्यासाठी नेहमीच..........बदलते
एका रात्रीच सौख्य.......त्या कळीच आयुष्य बदलते
ती पण "चिंधी"च का?

ह्या आहेत "चिंध्या ......"
कोणाच्या? का? कशासाठी?
सांगाल...........

**शशांक नवलकर**

## "चौकटीबाहेर जाऊन जरा विचार करूया"

हो तेच ते... **Think Outside The Box**

"ह्याचा खरा प्रत्यय हा "हटके" अंक करताना आला. नेटाक्षरीने ह्या अंकात कुठल्याही चौकटीत न बसणा-या काही मुक्त, वेगळ्या हटके आणि तितक्याच अर्थपूर्ण काव्य रचना प्रसिद्ध केल्या आहेत. कवीच मन हे अगदी कापसासारखं असत, भावनांची ऑल लागताच भिजणार आणि वा-याची हलकीशी झुळुक  लागताच उडणार आणि मग ते उडत उडत अश्याच काही न स्पर्शिलेल्या विषयांवर जाऊन पडत जिथून ह्या "हटके" कवितांची निर्मीती होते. कठपुतळी, दुर्गंधी, देव नाही व्हावी नाही, चिंध्या, काळघोडे, भूमिती ह्या आणि अश्या अनेक काव्य रचनांतून त्या त्या कविमनाच्या चौफेर आकलन शक्तीचा प्रत्यय येतो. थोड्या वेगळ्या धाटणीच्या हटके मनाच्या झटकेदार काव्यरचना ह्या अंकात आपल्या समोर सादर करत आहोत. नेटाक्षरीच्या सर्व रसिक वाचकांना हि "हटके झटके" मेजवानी आवडेल अशी आशा आणि अपेक्षा सुद्धा....

संपादकीय

## अतिथी संपादकाच्या लेखणीतून......



नाव – शशांक रविंद्र नवलकर

निवास – कांदिवली (मुंबई)

व्यवसाय – नेटवर्क इंजिनियर

एका शेअर ब्रोकर च्या कंपनीत नेटवर्क इंजिनीयर म्हणून कार्यरत, तसेच *Creative* गोष्टींची आवड.

आयुष्यात "काहीतरी वेगळ" करायच ठरवल म्हणूनच आज काहीतरी वेगळ लिहू शकतो, म्हणूनच काहीतरी वेगळ्या विषयावर कविता लिहीणे सहज जमते आता मला. कविता लिहायची सुरूवातच मी कविता या विषयावरून केली. मग अनेक विषय हाताळण्याचा प्रयत्न केला अन माझी लेखणी कधी थांबलीच नाही आणि थकली तर अजिबातच नाही. आजवर मी अनेक कविता केल्या पण त्या कविता कीती प्रतिसाद मिळतील किंवा कितपत माझी 'वाह-वाह' होईल ह्यासाठी नव्हे तर "काही तरी वेगळं" मी सुद्धा करू शकतो ते जाणून घेण्यासाठी. आज मी माझ्या कवितांच्या शेवटानंतर माझे नाव लावतो " – शशांक नवलकर" तेव्हा मला आनंद इतका होतो की आभाळ ठेंगणे पडावे!!, कारण....... आज मी कोणत्याही विषयावर कविता लिहू शकतो........ "काही तरी वेगळं" लिहू शकतो

\- **शशांक नवलकर**

(अतिथी संपादक)

ई-साहित्य प्रकाशन

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक  लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**netaksharee@gmail.com**